अनुसूचित जातीच्या मुलामुलींना शिक्षणासाठी परदेशी शिष्यवृत्ती-सन २०१६-१७ साठी <u>उर्वरीत विद्यार्थ्यांची निवड करणेबाबत</u>

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः इबीसी २०१६/प्र.क्र.६३५/शिक्षण-१

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :- २० एप्रिल, २०१७

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २००३/प्र.क्र.११५/मावक - २, दिनांक ११.०६.२००३

२) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक -२, दिनांक १५.०७.२०१०

३) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक-२, दिनांक २२.१०.२०१०

४) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २०१३/प्र.क्र.१४१/शिक्षण-१, दिनांक ०८.०८.२०१३ व दि.२८.११.२०१३

५) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २०१४/प्र.क्र.८२/शिक्षण-१, दिनांक १२.०९.२०१४

६) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २०१५/प्र.क्र.६९/शिक्षण-१, दिनांक १६.०६.२०१५

७) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इबीसी २०१५/प्र.क्र.१४०/शिक्षण-१, दिनांक ३०.१०.२०१५

८) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग इबीसी २०१५/प्र.क्र.१४०/शिक्षण-१, दिनांक २४.११.२०१५

९) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इबीसी २०१५/प्र.क्र.९१ शिक्षण-१, दिनांक २६.४.२०१६

१०) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इबीसी २०१६/प्र.क्र.२८२ /शिक्षण-१, दिनांक ०८.०७.२०१६

११) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्रमांक सकआ/शिक्षण/परदेश शिष्यवृत्ती/२०१६-१७/पुणे/२५५३, दिनांक ०८.०७.२०१६

१२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इबीसी २०१६/प्र.क्र.३४४ / शिक्षण-१, दिनांक १६.७.२०१६

१३) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इबीसी २०१६/प्र.क्र.३४४ / शिक्षण-१, दिनांक २६.७.२०१६

१४) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इबीसी २०१६/प्र.क्र.४२६ शिक्षण-१, दिनांक २९.०९.२०१६

१५) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे दिनांक १५.१०.२०१६,२६.१०.२०१६ व दिनांक २२.११.२०१६ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

१. शासन निर्णय दिनांक ११.०६.२००३ अन्वये अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेशात नामांकित शिक्षण संस्थेत शिक्षणाची संधी मिळावी, याकरिता परदेशी शिष्यवृत्ती योजना लागू केली आहे. सदर योजनेमध्ये कालानुरुप वेळोवेळी सुधारणा करण्यात आलेल्या आहेत. अनुसूचित जातीतील विद्यार्थ्यांना परदेशातील शिष्यवृत्ती योजनेतंर्गत सन २०१६-१७ या वर्षाकरिता ५० विद्यार्थ्यांची संख्या वाढवून ७५ करण्यात आली आहे.

२. सन २०१६-१७ या वर्षाकरिता ज्या परदेशी विद्यापीठांचे वर्ल्ड रँकिंग QS Universities World Ranking १ ते ३०० मध्ये आहे, अशा नामांकित विद्यापीठातील विविध शाखांमध्ये सन २०१६-१७ मध्ये प्रवेश मिळालेल्या विद्यार्थ्यांपैकी यापूर्वी संदर्भीय दिनांक १६.७.२०१६ व दिनांक २६.७.२०१६ च्या शासन निर्णयान्वये ४९ विद्यार्थ्यांची आणि दिनांक १३.१२.२०१६ शासन निर्णयान्वये २३ विद्यार्थ्यांची अशी एकूण ७२ विद्यार्थ्यांची परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आलेली आहे. तद्नंतर आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे दिनांक १५.१०.२०१६,२६.१०.२०१६ व दिनांक २२.११.२०१६ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, परदेश शिष्यवृत्ती योजनेंर्तत उर्वरीत ३ विद्यार्थ्यांची निवड करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

३. अनुसूचित जातीतील विद्यार्थ्यांना परदेशातील शिष्यवृत्ती योजनेतंर्गत यापूर्वी एकूण ७२ विद्यार्थ्यांची परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्तीसाठी निवड करण्यात आलेली असुन, आता परदेश शिष्यवृत्तीसाठी पीएचडी करीता पुरेसे विद्यार्थी उपलब्ध न झाल्याने अंतरपरिवर्तनाने पदव्युत्तर पदवी या अभ्यासक्रमाकरीता विद्यार्थ्यांची निवड करण्याकरीता संदर्भीय १५.७.२०१० च्या शासन निर्णयानुसार शिष्यवृत्ती निवड समितीची दिनांक १६.१२.२०१६ रोजी निवड समितीची बैठक आयोजित करण्यात आली

होती. सदर बैठकीत झालेल्या निर्णयानुसार योजनेच्या संदर्भांकित शासन निर्णयातील अटी-शर्तीची पुर्तता करतात, अशा कु.ऐश्वर्या अरुण कांबळे, श्री.प्राशिकदिव्य प्रभुदास गजभिये व कु.सुप्रिया रामेश्वर उके या ३ विद्यार्थ्यांना परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मंजूर करण्यात येत आहे. सदर विद्यार्थ्यांची निवड यादी पुढीलप्रमाणे आहे.:-

| अ. क्र. | विद्यार्थ्यांचे नाव | परदेशातील विद्यापीठ | अभ्यासक्रम | कालावधी | निवडीचे कारण |
|---|---|---|---|---|---|
| १ | **ऐश्वर्या अरुण कांबळे** | The University of Auckland, New Zealand QSWR-८२ | Post Graduate Diploma in Science (Food Science) | १ वर्ष | QSWR नुसार निवड |
| २ | **प्राशिकदिव्य प्रभुदास गजभिये** | Texan A&M University USA QSWR-१५९ | Master of Science in Economics | २ वर्ष | QSWR नुसार निवड |
| ३ | **सुप्रिया रामेश्वर उके** | Texan A&M University USA QSWR-१५९ | Master of Science in Economics | २ वर्ष | QSWR नुसार निवड |

४. सदरहू विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती प्रदान करण्यासाठी आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर विद्यार्थ्यांची त्यांच्या अभ्यासक्रम पुर्ण होण्यासाठी नमूद असलेल्या कालावधीपर्यंतची शिष्यवृत्ती मंजूर करण्याची, तसेच विद्यार्थ्यांचे परदेशातील शिक्षण चालु असल्याच्या कालावधीत एखाद्या विद्यापीठाच्या शिक्षण शुल्कामध्ये वाढ किंवा घट होत असल्यास त्याबाबत शिष्यवृत्ती मंजूर करण्याचे प्राधिकार आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांना प्रदान करण्यात येत आहेत.

५. ज्या विद्यार्थ्यांना शासनामार्फत शिष्यवृत्ती मंजूर केली आहे, त्या विद्यार्थ्यांनी त्यांचे शिक्षण संपल्यानंतर देशाची सेवा करणे व त्यांच्या ज्ञानाचा फायदा देशाला करुन देणे आवश्यक आहे. या अनुषंगाने संबंधित विद्यार्थ्यांकडून शिष्यवृत्ती मंजूर करण्यापूर्वी हमीपत्र (BOND) लिहून घेणे बंधनकारक राहील.

६. परेदशात वैद्यकीय अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेली संस्था भारतीय आयुर्विज्ञान परिषद (Indian Medical Council) यांनी मान्यता दिलेली असणे आवश्यक आहे किंवा वैद्यकीय अभ्यासक्रमासाठी परदेशात प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांनी भारतात पदवी / पद्व्युत्तर पदवी घेऊन परत आल्यानंतर भारतीय आयुर्विज्ञान परिषद (Indian Medical Council) यांनी अनिवार्य केलेली परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. ती परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास सर्व रक्कम वसूलपात्र असेल, असे **हमीपत्र (BOND)** विद्यार्थ्यांकडून घेण्यात यावे.

७. परदेशातील पद्व्युत्तर पदवी किंवा पीएचडी पदवी विहित कालावधीत विद्यार्थ्यांने पूर्ण करणे आवश्यक आहे.

८. विद्यार्थ्याने परस्पर शैक्षणिक संस्था, विद्यापीठ अथवा अभ्यासक्रम अथवा ज्या ठिकाणी शिक्षण घेण्यासाठी त्यास मान्यता दिलेली आहे, ते ठिकाण बदलल्यास शिष्यवृत्तीची रक्कम संपूर्णत: वसूल करण्यात येईल.

९. **(अ)** ज्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आलेल्या अभ्यासक्रमाच्या एकूण खर्चाच्या रकमेपैकी प्रथम वर्षाचे अथवा ज्यांना द्वितीय वर्षाची शिष्यवृत्ती मंजूर झाली आहे त्याना द्वितीय वर्षाचे शुल्क, निर्वाह भत्ता व इतर अनुषंगिक खर्च यांची रक्कम संबंधित विद्यापीठाकडून प्रमाणित माहिती प्राप्त करुन घेऊन आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी थेट विद्यापीठास अदा करावी.

**(ब)** त्यानंतरच्या वर्षाचे शुल्क, निर्वाह भत्ता व इतर अनुषंगिक खर्च याबाबत विद्यापीठाकडून प्रमाणित माहिती आणि विद्यार्थ्याच्या प्रगती अहवाल प्राप्त करुन त्यानुसार आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी शासन निर्णयाप्रमाणे संबंधीत वर्षाची अनुज्ञेय शिष्यवृत्ती रक्कम संबंधीत विद्यापीठास अदा करावी.

१०. याबाबत होणारा खर्च हा "मागणी क्रमांक एन-३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१ - अनुसूचित जातीचे कल्याण, २७७, शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (वि.घ.यो.), (०४) (२३), विदेशात विशेष अध्ययन करण्यासाठी अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना राजर्षि शाहू महाराज शिष्यवृत्ती, (२२२५ ३८३ २), ३४ शिष्यवृत्त्या / विद्यावेतन" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून त्या अंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा. त्याकरीता आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

११. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी परदेशी शिष्यवृत्ती मंजूर करताना शासन निर्णय क्रमांक इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक-२, दिनांक १५.०७.२०१० व शासन निर्णय क्रमांक इबीसी २०१४/प्र.क्र.८२/शिक्षण-१, दिनांक १२.०९.२०१४ तसेच शासन निर्णय क्रमांक इबीसी २०१५/प्र.क्र.६९/शिक्षण-१, दिनांक १६.०६.२०१५ मधील अटी व शर्तीचे पालन करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२०१८३२११८७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrakant Haridas Wade

Digitally signed by Chandrakant Haridas Wade
DN: c=IN, o=SJ And SA, ou=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fda96a8ca4dd3ecbdbbe4b156e5eaa93f60f3e037cbbbbdefe9e2961f45f0960, cn=Chandrakant Haridas Wade
Date: 2017.04.21 12:31:10 +05'30'

**( चंद्रकांत ह.वडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानभवन, मुंबई
४. मा.सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानभवन, मुंबई
५. मा.विरोधी पक्ष नेता, विधान सभा / विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
७. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
१३. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे
१४. संचालक, वैद्यकीय शिक्षण संचालनालय, मुंबई
१५. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई
१६. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई
१७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचानालय, मंत्रालय, मुंबई,
१७. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग,
१८. सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण विभाग,
१९. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,
२०. निवड नस्ती (शिक्षण-१)